**मुंबई विद्युत शुल्क नियम, १९६२ मधील <u>नियम</u>**
**<u>क्र.४ (१) मध्ये सुधारणा करण्याबाबत .</u>**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : विशुनि -२०१५/प्र.क्र.१४३ /ऊर्जा-५**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २३ जून, २०१५.

**संदर्भ**:- १) शासन निर्णय,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग क्र. संकीर्ण -२०१४/ प्र.क्र. ५८८/ऊर्जा-२, दिनांक २६.०२.२०१५.

**<u>प्रस्तावना :-</u>**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि.२६/२/२०१५ च्या संदर्भांकित शासन निर्णयान्वये विद्युत निरीक्षणालय शाखा सार्वजनिक बांधकाम विभागाकडून ऊर्जा विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली आणण्यात आली. तसेच मुख्य विद्युत निरीक्षक या पदाची कर्तव्य पार पाडण्यासाठी अधिक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, उद्योग , ऊर्जा व कामगार विभाग, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात आले.

२. विद्युत निरीक्षणालय शाखेमार्फत औद्योगिक जनित्र संच नोंदणी केली जाते. याकरीता मुंबई विद्युत शुल्क नियम,१९६२ अस्तित्वात आहेत. सदर नियमातील नियम क्र.४ (१) नुसार औद्योगिक उपक्रमांना स्ववापरासाठी वापरण्यात येणाऱ्या जनित्र संचाच्या नोंदणीसाठी अर्ज शासनाच्या विद्युत अभियंत्याकडे तसेच अन्य कोणत्याही बाबतीत विद्युत निरीक्षकाकडे करण्याची तरतूद आहे. विद्युत निरीक्षणालयाचे ऊर्जा विभागाकडे हस्तांतरण झाल्यानंतर या तरतूदीमध्ये शासनाच्या विद्युत अभियंत्याऐवजी “मुख्य विद्युत निरीक्षक” असा बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

मुंबई विद्युत शुल्क नियम, १९६२ मधील नियम क्र.४ (१) मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

“या नियमाच्या अंमलबजावणीस प्रारंभ झाल्यानंतर केवळ स्वत:च्या उपयोगासाठी विद्युत शक्ती निर्माण करण्याची इच्छा असलेली किंवा निर्माण केलेली विद्युत शक्ती चालू ठेवण्याची इच्छा असलेली, अनुज्ञाप्तीधारका व्यतिरिक्त प्रत्येक व्यक्ती “नमूना - अ” मध्ये नोंदणीसाठी अर्ज करेल, हा वापर

औद्योगिक उपक्रमासाठी करण्यात येत असेल, तेंव्हा असा अर्ज शासनाच्या विद्युत अभियंत्याऐवजी मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मुंबई आणि अन्य कोणत्याही बाबतीत विद्युत निरीक्षकाकडे करण्यात येईल."

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०६२३१७४११८४३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sanjay Sharad Sirsikar

Digitally signed by Sanjay Sharad Sirsikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy & Labour, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Sharad Sirsikar
Date: 2015.06.23 17:43:42 +05'30'

**(सं.श.शिरसीकर)**

**शासनाचे सह सचिव**

**प्रत,**

मा.राज्यपालांचे सचिव,

मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

मा.मंत्री ( ऊर्जा) यांचे खाजगी सचिव,

मा.मंत्री (सा.बां.वि.) यांचे खाजगी सचिव,

अपर मुख्य सचिव (सा.बां.वि.) यांचे स्वीय सहायक,

प्रधान सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहायक,

मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मुंबई

सर्व विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

निवड नस्ती- ऊर्जा-५